**इयत्ता ८ वी ते १० वी मध्ये शिकणाऱ्या इतर मागास प्रवर्गातील मुलींना सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती योजना लागू करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : शिवृत्ती २०१८/प्र.क्र. २८३/शिक्षण,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३० जानेवारी, २०१९

वाचा- १. सामाजिक न्याय, सांस्कृतीक कार्य, क्रिडा विशेष सहाय विभाग शासन निर्णय क्रमांक. इमाव २००३/ प्र.क्र.२०१ / मावक -३ दिनांक २५जुलै,२००३

२. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.विजाभजसं/शिक्षण/इमाव साफुशि प्रस्ताव १३/२०१६-१७/ १९२६/पुणे, दि.१६/६/२०१६ व दि. ०३/०१/२०१९

**प्रस्तावना :-**

राज्यातील मागासवर्गीय मुलींचे (अनुसुचीत जाती/ विमुक्त जाती / भटक्या जमाती, धनगर, वंजारी सह व विशेष मागासप्रवर्ग) माध्यमिक शाळामधील गळतीचे प्रमाण रोखण्याच्या दृष्टीकोणातुन इयत्ता ८ वी ते १० वी च्या मुलींकरीता "सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती योजना" शासन निर्णय दि. २५ जुलै,२००३ अन्वये सुरु करण्यात आली आहे.त्याच धर्तीवर इतर मागास प्रवर्गातील मुलींमध्ये शिक्षणाची आवड निर्माण व्हावी , त्यांचे शिक्षणातील गळतीचे प्रमाण कमी व्हावे, त्यांचा शैक्षणिक सर्वांगीण विकास व्हावा म्हणून राज्यातील इयत्ता ८ वी ते १० वी मधील इतर मागास प्रवर्गातील मुलींना सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती योजना लागू करण्यास मा.मंत्रिमंडळाने दिनांक १५.०१.२०१९ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीमध्ये मान्यता दिलेली आहे. मा. मंत्रिमंडळाने दिलेल्या मान्यतेनुसार शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील इयत्ता ८ वी ते १० वी मध्ये शिकणाऱ्या इतर मागासवर्गीय मुलींसाठी सन २०१९-२० या शैक्षणिक वर्षापासून "सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती योजना" लागु करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती:-**

१. सदरची योजना राज्यातील माध्यमिक शाळा व इतर शैक्षणिक संस्थांमध्ये शिकणाऱ्या इतर मागास प्रवर्गातील इयत्ता ८ वी ते १० वी मधील मुलींना लागू राहील .
२. सदर योजनेच्या लाभासाठी उत्पन्नाची अट लागु राहणार नाही.
३. इयत्ता ८वी ते १० वी मधील इतर मागास प्रवर्गातील मुलींसाठी- दरमहा रु.१००/- प्रमाणे १० महिन्यांसाठी रु. १०००/- इतका लाभ देय राहिल.

मा.मंत्रिमंडळाने दिलेल्या मान्यतेप्रमाणे सदर योजनेसाठी नवीन लेखाशिर्ष प्राप्त करुन घेण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात यावी.

सदर योजनेवरील अनुदान व खर्चाबाबत संचालक,विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय,पुणे हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर अनुदानाची रक्कम आहरित करण्यासाठी कक्ष अधिकारी/ अवर सचिव (अर्थसंकल्प), विजाभज इमाव व विमाप्र कल्याण विभाग, आहरण व संवितरण अधिकारी, विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग कल्याण विभाग, मंत्रालय,मुंबई यांना घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १७/का-१४१३, दि. १४/०१/२०१९ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ---- दि. १६/०१/२०१९ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०१३११२५४४१३१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Shri Ravindra Gurav
Date: 2019.01.31 13:04:53 +05'30'

**(रविंद्र गुरव)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य. सचिव, मुंबई.
३. मा. मंत्री, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, कृषी व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव (प.दु.म.), कृषी व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन सर्व विभाग.
१३. आयुक्त, समाज कल्याण, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१६. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७. महासंचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१९. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२१. .सर्व प्रादेशिक उपायुक्त/सहायक आयुक्त, समाजकल्याण विभाग.
२२. निवासी लेक्षा परिक्षा अधिकारी, मुंबई.
२३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२४. कक्ष अधिकारी, विधानमंडळ अनुसूचित जाती कल्याण समिती, विधानभवन, मुंबई.
२५. कक्ष अधिकारी, विधानमंडळ इतर मागासवर्ग कल्याण समिती, विधानभवन, मुंबई.
२६. निवड नस्ती (कार्यासन-शिक्षण).